**नाशिक विभाग विकास कार्यक्रम**
**सन २००९-२०१० ते २०११-२०१२**
**आदिवासी उपयोजनेंतर्गत घेण्यांत आलेल्या योजनांबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विकास,**
शासन निर्णय क्रमांक:- टिएसपी-२०१०/प्र.क्र.१३२/का.६,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक :- २८ जुलै, २०१०.

वाचा :- नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक नाविका-२००९/प्र.क्र.१२/का.१४२०,
दिनांक २७ ऑगस्ट, २००९.

**शासन निर्णय** :- नाशिक विभाग विकास कार्यक्रम २००९-१० ते २०११-१२ अंतर्गत नाशिक, धुळे, नंदूरबार, जळगांव व अहमदनगर या जिल्हयांसाठी सन २००९-१० ते सन २०११-१२ या तीन वर्षात खालील योजनांसाठी रु. ४०८.५८ कोटी एवढी तरतूद मंजूर करण्यांत येत आहे. त्याचा योजनानिहाय व वर्षनिहाय तपशील खालीलप्रमाणे आहे :-

**नाशिक विभाग विकास कार्यक्रम सन २००९-१० ते २०११-१२**

( रु. कोटीत )

| अ. क्र. | योजनेचे नांव | वर्ष | | | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| | | आदिवासी उपयोजना २००९-१० | आदिवासी उपयोजना २०१०-११ | आदिवासी उपयोजना २०११-१२ | आदिवासी उपयोजना २००९-१२ |
| १ | विशेष कृती कार्यक्रम अक्कलकुवा व धडगांव. | ४४.०० | ४०.०० | ४०.०० | १२४.०० |
| २ | आदिवासी आश्रमशाळांचे बांधकाम. | ३०.०० | ३०.०० | ३०.०० | ९०.०० |
| ३ | आदिवासी वसतिगृहांचे बांधकाम. | २०.०० | २०.०० | २०.०० | ६०.०० |
| ४ | आदिवासी क्रिडा प्रबोधिनी स्थापन करणे. | ५.०० | १०.०० | १०.०० | २५.०० |
| ५ | ग्रामपंचायतीसाठी पथदिवे बसविणे. | २.५० | २.५० | ०.०० | ५.०० |
| ६ | आदिवासी संस्कृती जतनसाठी नंदूरबार येथे म्युझियम बांधणे. | १.०० | २.०० | २.०० | ५.०० |
| ७ | सौर उर्जा चलित दिवे. | ४.०० | ४.०० | ४.०० | १२.०० |
| ८ | आदिवासी भागात ३०० ते ५०० लोकवस्ती असलेल्या गावांना जोडण्यासाठी ग्रामरस्ते/साकव बांधणे. | ११.८६ | ११.८६ | ११.८६ | ३५.५८ |
| ९ | आदिवासी भागात ग्रामपंचायत कार्यालयाची स्थापना/निवासस्थान. | १०.०० | २०.०० | २०.०० | ५०.०० |
| १० | शेततळे | ०.५० | ०.७० | ०.८० | २.०० |
| | **एकूण** | **१२८.८६** | **१४१.०६** | **१३८.६६** | **४०८.५८** |

२. आदिवासी उप योजनेतंर्गत नाशिक विभाग विकास कार्यक्रमासाठी राज्य योजनेखाली वर नमूद केल्याप्रमाणे नियतव्यय उपलब्ध करुन देण्यांत आला असून सदर नियतव्यय ठोक स्वरुपात

अर्थसंकल्पीत करण्यांत आला आहे. यास्तव नाशिक विभाग विकास कार्यक्रमाखाली विशेष उपाय योजनांसाठी सन २०१०-२०११ या चालू आर्थिक वर्षाकरिता उपलब्ध करुन दिलेली तरतूद खर्च करण्यासाठी तसेच नवीन योजनेस मंजूरी देण्यासाठी प्रस्ताव तातडीने विभागास सादर करावा.

३. वर नमूद केलेल्या योजना राबवितांना आदिवासी क्षेत्रातील लाभार्थ्यांना प्राथम्य देण्यांत यावे. सदर योजनेचा लाभ आदिवासी क्षेत्रातील आदिवासींना देण्यांत यावा. आदिवासी क्षेत्राबाहेरीत लोकांना या योजनांचा लाभ देण्यांत येणार नाही याची कृपया नोंद घ्यावी.

४. नाशिक विभाग विकास कार्यक्रमातील वर नमूद योजना राबवितांना खालीलप्रमाणे कार्यवाही करावी.

अ) आदिवासी उप योजनेतर्गंत गावाची/वाडीची अडचण लक्षात घेऊन कामांचा प्राध्यान्यक्रम ठरविण्यांत यावा.
ब) यापूर्वी आदिवासी उपयोजनेतंर्गत ज्या गावांत/वाडीची अशी कामे झाली असल्यास त्या गावात/वाडीत अशी कामे न घेता ज्या गावांत/वाडीत अशी कामे झाली नाहीत तेथे घेण्यांत यावीत.
क) अपूर्ण कामे प्राधान्याने पूर्ण करण्यांत यावीत.
ड) आयुक्त,आदिवासी विकास, नाशिक यांनी संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास यांचे कडून वरील योजनांचे प्रस्ताव प्राप्त करुन घेऊन सदर प्रस्तावांची छाननी करुन अंतिम प्रस्ताव तात्काळ मान्यतेसाठी आदिवासी विकास विभागाकडे पाठवावेत.
ई) सदर योजनांच्या अनुषंगाने संबंधित मंत्रालयीन विभागांनी प्रस्ताव प्राप्त करुन घेऊन प्रस्तावांची छाननी करुन अंतिम प्रस्ताव तात्काळ मान्यतेसाठी आदिवासी विभागाकडे पाठवावेत.

५. सदरचा शासन निर्णय शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा **संगणक सांकेतांक क्रमांक २०१००७२८१७४५०१००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सुदनाईक 28/07/2010

**( सु.द.नाईक )**
**कक्ष अधिकारी**

प्रति,
१) मा. मुख्यमंत्र्याचे सचिव,
२) मा.उपमुख्यमंत्र्याचे सचिव,
३) सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४) शासनाचे मुख्य सचिव,
५) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
६) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
७) विभागीय आयुक्त, नाशिक.
८) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
९) जिल्हाधिकारी, नाशिक, धुळे, नंदुरबार, जळगांव व अहमदनगर.
१०) अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
११) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१३) निवड नस्ती ( का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.